भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील सहाय्यक रसायनी गट-ब या पदावरील तात्पुरती पदोन्नती

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन आदेश क्रमांकः आपना-०२२५/प्र.क्र.६४/पापु-१५**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१

**तारीख:** १९ मे, २०२५

**शासन आदेश :-**

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार व दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून यासंदर्भात मा.न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील खालील कनिष्ठ रसायनी यांना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील "सहाय्यक रसायनी गट-ब, या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयामध्ये करण्यात येत आहे :-

| अ. क्र | कनिष्ठ रसायनी यांचे नाव | मूळ प्रवर्ग | पदोन्नती चा प्रवर्ग | सध्या कार्यरत | सहाय्यक रसायनी पदावरील पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्रीमती प्रार्थना गजेंद्र डिवरे/ सरोदे | इ.मा.व. | सर्वसा | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भू.स.वि.यं., नागपूर. | प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भू.स.वि.यं., नाशिक. |

**०२.** उपरोक्त अधिकाऱ्यांची सहाय्यक रसायनी (गट-ब) या पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

पदोन्नत अधिका-यांविरूध्द कोणतेही न्यायालयीन प्रकरण किंवा विभागीय चौकशी प्रस्तावित किंवा प्रलंबित नसल्याच्या अटीच्या अधीन सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तथापि यापैकी एखाद्या कनिष्ठ रसायनी विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण दाखल असल्यास त्यांच्या बाबतीत सदर पदोन्नतीचे आदेश आपोआप रद्द होतील.

**०३.** सदर पदोन्नती आदेशातील जे अधिकारी पदोन्नती नाकारतील त्यांच्या बाबतीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १२.०९.२०१६ नुसार कार्यवाही करण्यात येईल.

**०४.** संबंधित प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी त्यांच्याकडील अधिका-यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी तात्काळ (अधिकाधिक सात दिवसांत) कार्यमुक्त करावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. संबंधित पदोन्नत अधिका-यांनी सध्याच्या पदावरून कार्यमुक्त झाल्यानंतर रजेवर न जाता कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रूजू व्हावे. नवीन नियुक्तीच्या ठिकाणी संबंधित प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी पदोन्नत अधिकाऱ्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०५.** संबंधित पदोन्नत अधिकारी या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांत पदोन्नतीच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या बाबतीत शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १४.०७.२०२१ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिका-याचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. जे अधिकारी ३० दिवसाच्या कालावधीत पदोन्नतीच्या पदावर रूजू होणार नाहीत, अशा अधिका-यांचा अहवाल आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी शासनास सादर करावा.

**०६.** संबंधित पदोन्नत अधिका-यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २३ मधील तरतूदींकडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, पदोन्नत अधिका-यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा नियम, १९७९ मधील नियम २३ नुसार शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

**०७.** सदरील पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीनतेने करण्यात येत आहे.

**०८.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१९११५०५२२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2025.05.19 17:48:16 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, सर्व.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१३. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१५. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
१७. संबधित अधिकारी, (आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा/संबंधित जिल्हा परिषद मार्फत).
१८. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख.
१९. निवडनस्ती, कार्यासन पापु-१५.